

ग्रन्थकर्ता
हरि
विनायक
दात्ये

# शारदा

१६ माघ १८९०
५ फेब्रुवारी १९६९



## संगीत-शब्द-सूची



गायनी
कला

हरि विनायक दात्ये

# ना द ब्र ह्म

चैतन्यं सर्वभूतानां विवृतं जगदात्मना ।
नादब्रह्म तदानन्दम् अद्वितीयम् उपास्महे ।। संगीतरत्नाकरः

हरि विनायक दात्ये । अस्माकं मित्रोत्तमः । नादमाधुर्यलुब्धः । पुण्यपत्तने राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघस्य 'घोष-'विभाग-प्रमुखः । हिन्दुस्थान-साहित्य-प्रकाशन-संस्था-संचालकः । सहृदयः । रसिकः । चिन्तनशीलः । अभ्यासव्रतः । अनेन वाद्य-वृन्दसंचालनकर्मणि व्ययीकृतं स्वीयम् आयुः । परम् अन्ततो गत्वा स्वीयम् अध्ययनफलम् अस्माकं सर्वेषां पुरस्तात् स्थापितम् । तस्य नाम 'गायनी कळा' । संगीतशास्त्रविषयकम् अभिनवम् इदं ग्रन्थरत्नम् । महान् अस्य रचनायां तेषां परिश्रमः । कठोरं तपः । सूक्ष्मेक्षिकया निरीक्षणम् । परीक्षणम् । चिन्तनम् । अक्षरीकरणम् ।

इदम् अक्षरं ग्रन्थरत्नं 'शारदा'कारैः प्रशंसितम् । तत्र कारणम् ? ग्रन्थरत्नस्य संस्कृतमूलता ।

इयं तत्र प्रतिपाद्यानां विषयाणाम् अनुक्रमणिका । १ रूपरेषा २ नाद ३ संवादभाव ४ स्वरकुल ५ स्वराक्षरे ६ कालमान ७ शक्तिलेखन-वर्णलेखन ८ रचना ९ वाग्गेयकार-कलाकार १० वाद्यविवरण ११ वर्णाक्षरें १२ स्वरान्तर १३ संक्षेपचिह्नें १४ शुद्धलेखन १५ सांघिक १६ साधनम् ।

वंशीज-शंखज-अवनद्ध-वाद्य-कुलेषु वेणु - नागाङ्ग - स्वरद-गोमुख-तूर्यशृङ्ग-प्रतानप्रतूर्य-महाशङ्ख-विषाण - पौण्ड्र - गोमुखी - मृदङ्ग - पणव-खरजानक-पूर्णानक-प्रभृतीनां वाद्यविशेषाणां सचित्रं ( आर्टप्लेट ) परिचयः ।

३३ पाठैः स्वर-मात्रा-यति-चिह्नादीनां पाठनम् । तत्र तत्र चित्र-मुद्रा-विन्यासः । १३ परिशिष्टेषु स्वर-श्रुति-पाश्चात्यस्वर-संवादभाव-स्वरकुल-मेल (थाट)-रागलक्षण-मात्रा-लय-ताल-हार्मोनियमरचना-स्टाफ-नोटेशन-पं. पलुस्कर–पं. भातखण्डे लेखनपद्धतिः–इति विषयविन्यासः ।

त्रयोदशं परिशिष्टं शब्दसूची । तत्र त्रिशताधिकाः ( ३०० ) संगीतोपयोगिनः शब्दाः । तत्र प्राचुर्यं संस्कृतस्य । नायम् अपघातः । अपरिहार्यम् इदम् । पारिभाषिक-कोषकार्याणां कृते संस्कृतम् एव शरणम् । न मार्गान्तरम् । अतः संस्कृतं सर्वशास्त्रोपकारकम् । सर्वेषां साहाय्यकम् । सर्वाधारमूलम् । अमुम् एव सिद्धान्तं स्पष्टीकर्तुम् अस्मिन् अङ्के संगीतशब्दसूची प्रकाश्यते । अभिनन्दनं सूचीकाराणां मित्रवराणां ह.वि.दात्ये महोदयानाम् ।

ब्रह्मचारिणः मित्रोत्तमस्य इदं ग्रन्थरत्नरूपम् अपत्यं सर्वत्र दशदिक्षु चिरं कीर्तिरूपं जीवतु । सुयशः संपादयतु । प्रार्थ्यते 'शारदा'कारैः इयं विद्यावंशवृद्धिः । तदर्थं सर्वे रसिकाः १२ मुद्रामूल्यप्रेषणेन रत्नम् इदं स्वीकुर्वन्तु । प्रेषयन्तु मुद्राद्वयम् । त्वर्यताम् । ग्रन्थरत्नं संगृह्यताम् ।

परिशिष्ट १३ | शब्दसूची

(केवळ संगीतोपयोगी)

*[ओळीच्या अखेरीस असणारे अंक पृष्ठ-क्रमांकांचे आहेत.]*

**अ** – अवग्रहाचें आद्याक्षर; अवग्रहासाठीं उच्चारावयाचें अक्षर. ४६.
**अग्रणी** – प्रमुख गायक-वादक; दल-प्रमुख किंवा वाद्य-प्रमुख.
**अग्रवत्** – पुढच्याकडे पाहून; पुढच्याचें ऐकून; समोरच्याप्रमाणें.
**अग्रवर्ती** – इतरांनीं अनुसरण्यासाठीं प्रथम म्हणणारा-वाजविणारा-सांगणारा.
**अग्रेसर** – व्यूहांतील आधारभूत व्यक्ति; प्रमुख गायक-वादक.
**अंकन** – मात्रामापन.
**अचल** (स्वर) – विकृत न होणारे स्वर; षड्ज व पंचम हे स्वर. २५.
**अति** – अधिकता-तीव्रता (व्यक्तविणारा उपसर्ग); (उदाहरणार्थ, अतिमन्द्र, अतितार, अतिविलंबित, अतिद्रुत). २८, ६६.
**अनुतंकार** – प्रत्याघातांनीं वाजणारा तंकार; अनुसरणारा तंकार; प्रतिध्वनीप्रमाणें ऐकूं येणारा तंकार. (समान शब्द – अनुटंकार, अनुझंकार, अनुध्वंकार इ०)
**अनुरणन** – १:२, १:३, १:४, १:५, १:६ इत्यादि प्रमाणांनीं उपकम्पनांमुळें निघणारे उपनाद (Overtones).
**अनुवर्ती** – अनुसरणारा; ऐकून म्हणणारा-वाजविणारा; मागें म्हणणारा-वाजविणारा; दोहरविणारा.
**अनुशासन** – शिस्त; व्यवस्था; योजना; पाळावयाचे नियम. १३२.
**अपघाती** (स्वर) – स्टाफ-नोटेशन या लेखन-पद्धतींत येणारे अनपेक्षित विकृत-स्वर (Accidental = ♮ # ♭ etc. occurring incidentally). ५४.
**अपसारण** (चिन्ह) – उणें-चिन्ह; यतीसाठीं लिहावयाची रेषा; आडवी रेषा. (Dash) ४७.
**अलंकार** – पाठान्तरासाठीं—अभ्यासासाठीं रचलेले स्वरपाठ.
**अवकाश** – नादरहितता; पोकळी; दोन ठोक्यांतील अन्तर. ६५, ६७.
**अवग्रह** – आधींच्या मात्रेचें कालमान वाढविणारें चिन्ह; द्विखण्ड-चिन्ह ('ऽ' हें चिन्ह). ३७, ४५, ४६, ४७.
**अवघात** – आघातानंतर तातीमुळें होणारा प्रत्याघात; दुसऱ्या पुडावर आपोआप होणारा आघात. ११७.

**अवच** – अपेक्षेपेक्षां कमी कम्पनांचा नाद; नीच–खालचा नाद (Low pitch). १०.

**अवनद्ध** – वाद्यांचा एक वर्ग; चर्म-वाद्यें; मृदंग, आनक, पणव इत्यादि वाद्यें (Drums). ७९, ८७.

**अवनम** – वादन-स्थितीमधून पूर्व स्थितींत येणें; दक्षमध्यें येणें.

**अवरुद्ध** (वायु) – अडविलेला–कोंडलेला–बंदिस्त वायु. १२.

**अवरोह** – उच्च स्वराकडून अवच स्वराकडे जाणारा क्रम; तारकडून मन्द्रकडे जाणारा क्रम. स्वरांची उतरंड. ५५, ५६.

**अवसान** – (१) न्यास, समाप्ति, (२) वजन, जोम, उशी, आघात (Accent). ५९.

**अविकृत** – विकृत नसलेले, कोमल–तीव्र होऊं शकणारे, री ग म ध न हे स्वर. २६.

**आघात** – अवनद्ध अथवा घन वाद्यांवर वादनासाठीं दिलेला ठोका (Beat). ९४, १०६, १०७.

**आघात-स्वर** – निमुळता होत जाऊन विलय पावणारा स्वर; विझत जाणारा स्वर. १०७ ते ११०.

**आनक** – अवनद्ध वाद्याचा एक प्रकार; चर्मवाद्य; तांत असलेला व उभ्यानें वाजविण्याचा मृदंग—दुंदुभी; (Side Drum). ८८, ९३. (चित्रावली पाहा.)

**आरंभिक** – ध्रुवपदासारखा छोटा चरण; रचनेचें तोंड.

**आरोह** – अवच स्वराकडून उच्च स्वराकडे जाणारा क्रम. मन्द्रकडून तारकडे जाणारा क्रम; स्वरांची चढण. ५५, ५६.

**आलाप** – काव्यरहित संथ स्वरविलास. १११.

**आलेख** – लिहिलेली रचना; स्वर-तालांचें लेखन. ३१.

**आवर्तन** – चक्राकार गतीनें मूळ पदावर येणें; तेंच तें पुन्हा करणें—गाणें—वाजविणें; पुनरावृत्ति. ५९, ६०.

**आश्रयी** (राग) – दुसऱ्या रागाप्रमाणें वाटणारा राग.

**आस** – कम्पनीयता अतूट राखून केलेलें स्वरान्तर. ९५.

**उच्च** (नाद—स्वर) – सापेक्षतेनें अधिक कम्पनांचा नाद किंवा स्वर; 'अवच'च्या विरुद्ध नाद (High Pitch). १०.

**उच्चावचता** – (उच्चता = उंची + अवचता = नीचता किंवा खोली.) ध्वनिलहरींच्या कमीअधिक गतीचा कानास कळणारा परिणाम; नादाची पातळी (Pitch; Height or depth of the sound). १०.

**उद्घोष** – शंख-वादनाने द्यावयाचा आदेश—आज्ञा (Calls). ६४, १११.

**उपकम्पनें** – मुख्य कम्पनांसमवेत उत्पन्न होणारीं सूक्ष्म कम्पनें. १४.

**उपनाद** – उपकम्पनांमुळें उत्पन्न होणारा नाद; नादांची वर्ण-जाति ठरविणारे सूक्ष्म व स्वयंभू नाद (Overtones). १३, १४, ९२.

**उपवीतक** – घोष-प्रमुखानें परिधान करावयाचा शोभिवंत पट्टा (Sash).

**ऋषभ** – सप्त स्वरांतील दुसरा स्वर; पंचमाचा पंचम; पंचमभावानें येणारा तिसरा स्वर. (Re; Supertonic) २३.

**ओंकार** – नादब्रह्म लिहून व्यक्त करणारें अक्षर; प्रणव-लेखन; ॐ. १२३.

**कंस** – 'कोष्टक' पाहा. ४३, ४४, ९५.

**कण-यति** – सूक्ष्म विश्रांति; सान्तर गायन-वादनामुळें येणारी नाममात्र विश्रांति. ९७, ९८.

**कण-स्वर** – सूक्ष्म मात्रेचा स्वर; नाममात्र कालमानाचा स्वर. १०३ ते १०६.

**कम्प्** – हालणें; कापणें; थरथरणें (To vibrate). ९, १५.

**कम्पक** – कम्प उत्पन्न करण्याचें साधन किंवा माध्यम; शारिका, तालक, नखी, गज, बोटें, भाता इत्यादि. १५

**कम्पन** – कम्प पावण्याची क्रिया किंवा व्यापार (Vibration). १०.

**कम्पनीय** – कम्प पावण्याच्या योग्यतेचा-ची चें. १४, १५.

**कम्पमान** – कम्प पावत असलेला-ली-लें; कम्प्र. १४, १५.

**कम्प्य** – कम्प पावण्यास योग्य असा. १५.

**कम्प्यभाव** – कम्प पावण्याची योग्यता, पात्रता, शक्ति किंवा कुवत; कम्प्रता; कम्प्तृता. १४, १५.

**कम्प्यता** – 'कम्प्यभाव' पाहा. १५.

**कम्पनीयता** – 'कम्प्यभाव' पाहा.

**कम्पित** – 'कम्पमान' पाहा.

**कम्पिका** – कम्प पावणारा चिमटा; स्वरशूल (Tuning fork).

**कम्पायक** – कम्प उत्पन्न करणारा; गायक—वादक.

**करपल्लवी** – ताल, लय, संकेत, आदेश इत्यादि दर्शविण्यासाठीं हातांनीं केलेल्या खुणा किंवा हालचाली. ६८.

**करताल** – मोठी व लोखंडी चिपळी; चिमटा; एक प्रकारचें ताल-वाद्य. ८८.

**कर्णप्रत्यय** – ऐकण्यामुळें येणारा—पटणारा अनुभव किंवा ज्ञान.

**कलश** – घोषदण्डाचा गोलक.

**कला** – नित्यनूतन व मनोरंजक कृति.

**कलाकार** – कला सादर करणारी व्यक्ति; गायक—वादक. ६९ ते ७१.

**काफी** – एका थाटाचें नांव; गांधार व निषाद हे स्वर विकृत असणारें सप्तक; खरहरप्रिय मेल (Minor scale). ५४, १५०.

**काल** – (१) वेळ, समय, अवधी (Time). (२) संवादी मात्रा. (Next to strongest accent). ६३.

**कालमान** – वेळेचें मोजमाप (Duration). १०, ११, ३६ ते ४९.

**काळी एक** – 'पट्टी' पाहा.

**कुक्कुट** – एक प्रकारचें सुषिर वाद्य; कोंबड्याप्रमाणें दिसणारें व कांहींसा तसाच आवाज देणारें वाद्य. हें वाद्य षड्ज-पंचम चालू ठेवून आठ स्वरांत वाजूं शकतें (Bag-pipe). ९८.

**केन्द्रतः** – व्यूहाच्या मध्याकडून.

**केरवा** (कहरवा)–तालाचा एक प्रकार; आठ लघु मात्रांचा ताल; मात्रा गट व गण समसमान असणारा ताल; धागे-नाति-नक-धिन याप्रमाणें बोल असणारा ताल (Two-Four Time). ६१, ६२, १५३, १५४.

**कोमल**–अर्ध्या स्वराची—एक पट्टीची अवच विकृति; 'ऌरी ऌग ऌम ऌध ऌन' हे स्वर; मृदु स्वर (Flat). ३०.

**कोष्टक**–बंधक; प्रमाणबद्ध तालिका; कंस; स्वरसमूह एकत्र दर्शविणारें चिन्ह; निरन्तर गायन-वादनाचें चिन्ह (Legato; Bound). ४३, ४४, ९५, १५३, १५४.

**क्षेपक**–कर्णा; नाद फेकणारें (फाकणारें) वाद्याचें तोंड; घंटा (Bell).

**खर्ज**–मन्द्रतर स्वर (Bass Tones). ९२.

**खेमटा**–तालाचा एक प्रकार; बारा लघु मात्रांचा ताल; तीन लघु मात्रांचा गट, दोन गटांचा गण, दोन गणांचा ताल; 'धाटेधी-नाधीना-ताटेती-नाधीना' अथवा 'धिंऽन-धिनक-तिंऽन-तिनक' याप्रमाणें बोल असणारा ताल (Six–Eight time). १५३, १५५-

**ग**–गांधाराचें स्वराक्षर; 'ग' (ग्)–गांधाराचें कण-स्वराक्षर. ३०

**गट**–मात्रांचा समूह; मात्रा व गण यांच्यामधील तालाचें परिमाण; तालांतील टाळ्या वाजविण्याचें वर्गीकरण (Group). ५९, १२५.

**गण**–तालाचे मुख्य व समान भाग; गट व ताल यांमधील परिमाण (Bar); मात्रांची विशिष्ट रचना किंवा खंड; एक प्रकारचा वृत्ताचा घटक. ४४, ५९, ६०.

**गणदण्ड** – गण दर्शविणारी उभी रेषा (Bar-line). ६२.

**गणवेष** – समान वेष; सैनिकी वेष; समवेष (Uniform). १३४.

**गणसाधनम्** – सर्व प्रकारची सिद्धता करण्याची क्रिया किंवा कृति; संपत्-सम्यक्. संख्या इत्यादींसह सिद्धता; वादनाची पूर्वतयारी (Make ready). १३५.

**गति**–वेग; चैतन्य; अस्थिरता (Speed). १०, ११, १७.

**गत्यन्तर**–भिन्न गतींत जाणें; चालू गति बदलणें.

**गांधार** – सप्त स्वरांतील तिसरा स्वर; ४ : ५ या संवादभावानें येणारें नादस्थान; पंचमभावानें येणारा पांचवा स्वर (Mi; Mediant). २०

**गायक** – शब्दांसह स्वरतालादि म्हणणारा; गाणारा. ७०

**गायन** – गायकानें केलेली रंजक व कलापूर्ण शब्द व नाद यांची निर्मिति.

**गीत** – गायनास योग्य असें काव्य.

**गुरु** – मात्रांचें प्रमुख किंवा मध्यवर्ती परिमाण (Crotchet). ३६, ३७, ३९.
—गुरुतर–गुरु मात्रेच्या दुप्पट कालाचें परिमाण (Minim). ३७, ४६.

—गुरुतम – गुरु मात्रेच्या चौपट कालाचें परिमाण (Semibreve). ३७, ४६.

**गोमुख** – एक सुषिर वाद्य; शंखज वाद्याचा एक मोठा प्रकार (Euphonium). (चित्रावली पाहा.)

**घन** (वाद्यें) – धातूंचीं भरीव वाद्यें; त्रिभुज, टोल, घंटा इत्यादि वाद्यें. वाद्यांच्या चार प्रकारांतील 'घन' हा एक प्रकार आहे. ७९, ८७.

**घनता** – नादाची शक्ति (Volume). १६.

**घसीट** – आरोही मींड. १०३.

**घोंकार** – अवनद्ध वाद्यांपैकीं खरज वाद्यांचा नाद — शब्द. घुमारा.

**घोष** – (१) सांघिक व सैनिकी गायन–वादन करणारा वृंद; (Band). (२) सांघिक पठण; सांघिक वादन. ६, ७, ८, ६४, ६८.

**घोषदण्ड** – घोषाचें नियंत्रण आणि मार्गदर्शन करण्यासाठीं वापरली जाणारी गदा; सुशोभित काठी. (Drum-Majors' Staves)

**घोष-प्रमुख** – घोषाचा प्रमुख अधिकारी (Band Commander)

**घोषसाधनम्** – 'गणसाधनम्' पाहा.

**चरण** – संगीत-रचनेंतील वाक्य; रचनेचा एक स्वयंपूर्ण भाग. ६४.

**चरणदण्ड** – चरणाची समाप्ति दर्शविणाऱ्या उभ्या रेषा; दण्डद्वय (Double bar). ६५.

**चर्म** – अवनद्ध वाद्यांत वाजणारें कातडें; कातडी पुडें; कम्पनीय कातडें. ८९.

**चर्मबंध** – 'बंधक' पाहा.

**चल** – (१) विकृत होऊं शकणारा स्वर; री, ग, म, ध, न हे पांच स्वर. २५.
(२) चला; चालूं लागा.

**चलन** – स्वरांच्या संचाराची पद्धति; घाटणी; वैशिष्ट्य; चाल-मोड.

**चलित** (गायन-वादन) – संचलनांत केलेलें (गायन-वादन).

**चित्रालेख** – तपमान, पर्जन्यमान, कालमान, उच्चावचतामान इत्यादि व्यक्तविणारें चित्र, ग्राफ (Graph). ३१.

**चिन्ह** – ठराविक अर्थ व्यक्त करणारी आकृति किंवा खूण (Sign). ४.

**छायालग** (राग) – अन्य (रागांची) छाया दिसणारा (राग). ५७.

**छेदक** – मातृकांना जोडणाऱ्या समान्तर रेषा; मात्रांचें विभाजन स्पष्ट करणाऱ्या रेषा; गट-रचना दर्शविणाऱ्या रेषा (Hooks or Tails). ३९ ते ४२.

**छेदिका** – मात्रांचें विभाजन दर्शविणारे अंक व महिरप. ४३.

**जाति** – उपनादांमुळें होणारी नादांची वर्गवारी; नादांची वर्णव्यवस्था (Timbre or quality). १४, १५.

**झ** – झंकाराचें स्वराक्षर–वर्णाक्षर. ८८, ९२, ९३.

**झंकार** – नादाची विशिष्ट जाति; झल्लरी, टाळ, झांजा, चिपळ्या, योगचाप ( लेझिम ) इत्यादींचा नाद; मिश्र उच्चावचतेंतील नाद-समुच्चय. ८८.

**झपताल** – तालाचा एक प्रकार; दहा लघु मात्रांचा ताल; एक गट केरव्याप्रमाणें व दुसरा गट खेमट्याप्रमाणें, अशा प्रकारचे दोन गण असणारा ताल; दशमान ताल; 'धीना-धीधीना-तीना-धीधीना' याप्रमाणें बोल असणारा ताल (Five-Eight Time). १५३, १५५.

**झल्लरी** – एक प्रकारचें द्विदल घन वाद्य; मोठी झांज. जोडी; झंकारयुक्त वाद्य; झालरा, झांगट (Cymbals). ८८, ९०.

**झील** – नगारा; बंबाच्या जोडीनें वाजणारें वाद्य; एक अवनद्ध वाद्य; चर्मवाद्याचा एक प्रकार (Kind of Drum) ८७. (चित्रावली पाहा.)

**ट** – टंकाराचें स्वराक्षर—वर्णाक्षर. ९२, ९३.

**टंकार** – (तालकांनी वाजणाऱ्या) घन वाद्यांचा नाद; नादांची विशिष्ट जाति; त्रिभुज, टोल, घंटा इत्यादि वाद्यांचा नाद. ८८, ९२.

**ठाय** (लय) – संथ लय; अति विलंबित लय (Molto Adagio). ६६

**डग्गा** – तबल्याच्या जोडीनें वाजणारें वाद्य; एक अवनद्ध वाद्य; (मृदंगाच्या) धुम्पुडासारखें वाजणारें वाद्य; बाया. (Kind of small drum). ९०, ९३. (चित्रावली पाहा.)

**त** – तंकाराचें स्वराक्षर—वर्णाक्षर. ९२, ९३.

**तंकार** – नादाची विशिष्ट जाति; शारिकांनीं वाजणाऱ्या अवनद्ध वाद्यांचा नाद; आनक, नगारा, ताशा इत्यादि वाद्यांचा नाद. ८९, ९२, ९३.

**तत** – वाद्यांचा एक प्रकार; तंतु-वाद्यें; तानपुरा, सतार, सारंगी, वीणा इत्यादि वाद्यें; वाद्यांच्या चार प्रकारांत 'तत' हा एक प्रकार आहे. त्यांत कम्पनीय पदार्थाचें कार्य तारा, ताती यांच्यामुळें होतें (String Instruments). ७९.

**तति** – ओळ; पंक्ति; एकाशेजारीं एक व एकाच दिशेस तोंड असणारी रांग; —(प्रतति – एकामागें एक याप्रमाणें राहून बनलेली रांग); घोष उभा राहाण्याच्या व्यूहांतील ओळी.

**तद्भव** (स्वर) – 'संस्कारित स्वर' पाहा.

**तंतु-वाद्य** – तार, तात, इत्यादि कम्पिनीं-(कम्पिन्, कम्पी)मुळें वाजणारीं वाद्यें. ८०.

**तबला** – डग्ग्याच्या जोडीनें वाजणारें वाद्य; एक अवनद्ध वाद्य; (मृदंगाच्या) शाई-पुडासारखें वाजणारें वाद्य (Kind of small drum). ८७, ८९, ९०. (चित्रावली पाहा.)

**तात** – आतडीं वळून बनविलेली दोरी; सारंगी, आनक इत्यादि वाद्यांत कम्पिनी म्हणून कार्य करणारा धागा (Cat's gutt; Snare). ७९, ११७.

**तार** – (१) (स्वर) उच्च स्वर; मध्य स्वरांच्या दुप्पट कम्पनांचे स्वर (Octave above). १८, २८, ३२. (२) तंतु. (String). ७९. (३) वंशी – उच्च-स्वरांची वंशी ७४.

— तारतर – मध्य स्वरांच्या चौपट कम्पनांचे स्वर; अतितार स्वर २८, ३२.

— तारतम – मध्य स्वरांच्या आठपट कम्पनांचे स्वर. ३३.

**ताल** – विविध मात्रांची वैशिष्ट्यपूर्ण व मनोरंजक रचना; मात्रा, गट व गण यांच्या विशिष्ट प्रकारच्या संगतींतून केलेली वजनांची वर्गवारी (Time). ५३, ५८ ते ६४, १५३ ते १५७.

**तालक** – ताल देण्याचें साधन; वादनासाठीं वापरावयाची बारीक हातोडिका; बनातीचा किंवा चामड्याचा गोळा जडविलेली शारिका. ८८.

**ताल-वाद्य** – सामान्यतः एकाच स्वरांत वाजणारें व मुख्यतः ताल व्यक्त करणारें वाद्य; मृदंग, पणवानक, त्रिभुज, झांजा, चौघडा इत्यादि वाद्यें. ८७ ते ९०.

**तालान्तर** – एका तालांतून दुसऱ्या तालांत जाण्याची कृति.

**ताशा** – एक अवनद्ध वाद्य (Kind of drum). ८७, ८८. (चित्रावली पाहा.)

**तीव्र** – अर्ध्या स्वराची किंवा एक पट्टीची उच्च विकृति; 'ᱢम' हा स्वर; तीव्र मध्यम. (Sharp). ३०

**तुमुल** – मोठा (नाद); प्रचंडतेची परमावधी (Loud). ५०, ५१, ५२.

**तूर्य** – एक प्रकारचें शंखज वाद्य; शंखापेक्षां बारीक नाळ असणारें वाद्य (Trumpet). (चित्रावली पाहा.)

**त्रिकुट** – तिनाचा गट किंवा समूह (Triplet). ४३, ४४.

**त्रिताल** – तालाचा एक प्रकार; सोळा लघु मात्रांचा (किंवा आठ गुरु मात्रांचा) ताल; चार लघु मात्रांचा गट, दोन गटांचा गण व दोन गणांचा ताल; धाधिंधिंधा-धाधिंधिंधा-धातिंतिंता-ताधिंधिंधा याप्रमाणें बोल असणारा ताल; आदिताल (Four–Four or Common Time). १५३, १५६.

**त्रिभुज** – एक प्रकारचें घन वाद्य; त्रिकोणी सळईचें ताल-वाद्य. (Triangle). ८८.

**थाट** – 'मेल' पाहा. ५४.

**दण्ड** – (१) उभी रेषा (गण-दण्ड, चरण-दण्ड इत्यादि. लेखनसंबंधित) (Bar-line). ६२, ६५. (२) घोष-दण्ड याचाच संक्षिप्त उल्लेख (संचलनसंबंधित). १३१.

**दण्ड-द्वय** – जोड दण्ड; चरण दण्ड; दोन उभ्या रेषा. ६५.

**दन्त्य** (वर्णाक्षरें) – त थ द ध न यांचें उच्चारण; तंकार, ध्वंकार इत्यादि नाद-प्रकार लेखनांत व्यक्त करण्यासाठीं वापरावयाचीं वर्णाक्षरें; त-वर्ग. ८९.

**दल** – वादकांचा गट; वाद्य किंवा वादन यांच्या अनुसार पाडलेले विभाग.

**दादरा** – तालाचा एक प्रकार; सहा गुरु मात्रांचा ताल; एका गुरु मात्रेचा गट, तीन गटांचा एक गण व दोन गणांचा ताल; धा-धि-ना-धा-तिं-ना, धिं-धिं-धा-धा-तू-ना

याप्रमाणें बोल असणारा ताल (Three-Four Time). १५३, १५४.

**दीर्घ** – लांब; ऱ्हस्वाच्या मानानें अधिक (कालमानाचा); गुरु (Long). ११.

**दुन्दुभि** – एक प्रकारचें अवनद्ध वाद्य. (Kind of big drum). ८९.

**दृक्प्रत्यय** – दृष्टिबोध; पाहाण्यामुळें पटणारा अनुभव.

**द्रुत** – (१) जलद; अधिक गतिमान; घाईची (लय) (Allegro). ३७; (२) लघूपेक्षां ऱ्हस्व (मात्रा). ३३.

**दोलनमान** – कम्पनांची संख्या; ध्वनिलहरींची गति; ध्वनीच्या आंदोलनांचें गणित (Frequency.) १०.

**द्विखण्ड** (चिन्ह) – अवग्रहाचेंच मर्यादित अर्थानें वापरलें जाणारें नांव.

**द्वित्त्व** – दोनदां; पुन्हा पुन्हा.

**ध** – धैवताचें स्वराक्षर; धंकाराचें वर्णाक्षर; '६' (ध्) – धैवताचें कण-स्वराक्षर. ३०.

**धैवत** – सप्त स्वरांतील सहावा स्वर; पंचम भावानें येणारा चौथा स्वर (La; Submediant). २३, २५.

**ध्वंकार** – घनगंभीर नाद; पणवाचा नाद; मोठा व भयावह नाद; स्फोटाचा ध्वनि. ८९.

**ध्वनि** – वायुलहरींचा कानावर होणारा परिणाम; श्रवणेंद्रियानें समजणारा परिणाम. ९.

**ध्वनिलहरी** – कम्पमान पदार्थामुळें वातावरणांत उत्पन्न होणाऱ्या लाटा. ९.

**ध्वनिशास्त्र** – ध्वनिविषयक सिद्धान्त (Acoustics). ५३.

**न** – निषादाचें स्वराक्षर. '~' (न्)-निषादाचें कण-स्वराक्षर. ३०.

**नध्री** – आनक व तत्सम वाद्यें अडकविण्याचा काटा; अडणी, टांगणी.

**नागांग** – नागाप्रमाणें दिसणारें एक सुषिर (वंशीज) वाद्य (Saxophone). ८१. (चित्रावली पाहा).

**नाद** – मधुर किंवा रंजक ध्वनि; नियमित व समानान्तर ध्वनिलहरींचा परिणाम (Musical Sound). ९, ९१.

**नादपट** – विशिष्ट उच्चावचतेमधला गाळा—पल्ला. ११,१५,७३.

**नादलहरी** – समानान्तर ध्वनिलहरी. ९.

**नादस्थान** – विशिष्ट कम्पनसंख्येचा मधुर ध्वनि. (Tone). १७.

**निरन्तर** – अखंड, अतूट, प्रवाही; फुंक किंवा श्वास न रोधतां (केलेलें स्वरान्तर) (Slur). ९४, ९५, ९६.

**निषाद** – सप्तस्वरांतील अखेरचा स्वर; पंचम भावानें येणारा सहावा स्वर. (Si; Leading note). २३.

**नीच** – 'अवच' पाहा.

**नृत्य** – संगीताचें तिसरें अंग; (१) गायन, (२) वादन व (३) नृत्य.

**नैमित्तिकानि** – प्रासंगिक कार्यक्रम; सामारंभिक कार्यक्रम.

**प** – पंचमाचें स्वराक्षर. '८' (प्) – पंचमाचें कण-स्वराक्षर. ३०.

**पंचम** – सप्तस्वरांतील पांचवा स्वर; दोनास तीन या प्रमाणानें येणारी उच्चावचता (Sol; Dominant). १९.

**पट** – कित्ता; संगीत-लेखनाचा आखीव कागद. (Stave). १६०.

**पट्टी** – हार्मोनियम व तत्सम वाद्यांवरील स्वरस्थान; प्रत्येक स्वरासाठीं दाबावयाची अलग अलग कळ; स्वरपट्टी. (पहिली पांढरी पट्टी षड्ज धरल्यास) सर्व पांढऱ्या पट्ट्या अविकृत स्वरांच्या असतात आणि सर्व काळ्या पट्ट्या विकृत स्वरांच्या असतात. एका सप्तकांत सात पांढऱ्या पट्ट्या व पांच काळ्या पट्ट्या असतात. २६.

**पट्टीबंद** (वाद्यें) – ठराविक स्वरस्थानें उपलब्ध असणारीं वाद्यें; ऐन वेळीं स्वरबदल अशक्य असणारीं वाद्यें; उदाहरणार्थ, हार्मोनियम, ऑर्गन, पियानो. ७३, १०२.

**पणव** – अवनद्ध वाद्याचा एक प्रकार; मोठा ढोल (Bass Drum). ८९. (चित्रावली पाहा.)

**पत्ती** – वाद्याची जीभ; वेताची पातळ पट्टी; स्वरद, शहनाई इत्यादि वाद्यांच्या मुखांतील कम्पिनी पट्टी (Reed). ७९, ८०.

**पथसंचलन** – सांघिक वाटचाल.

**पद** – (१) भाग; अंश. (२) गीत; गाणें. (३) पाय; पाऊल.

**पदन्यास** – नृत्यांत होणाऱ्या पावलांच्या हालचाली.

**परिमाण** – माप; एकक; प्रमाण (Measure).

**परिवर्तन** – बदल; उलट स्थिति (Change).

**पाट** – वर्णाक्षरें; बोलांसाठीं वापरलीं जाणारीं अक्षरें (पाटसंज्ञकाः). ९१

**पाठ** – अभ्यासासाठीं बांधलेले धडे; सोप्या व छोट्या रचना.

**पांढरी एक** – 'पट्टी' पाहा.

**पाश्चात्त्य** (पंडित) – ग्रीक, रोमन इत्यादि युरोपियांचे वारसदार.

**पुंस्वर** – पुरुषी आवाज; अवचताप्रधान अनुरणनांनीं युक्त स्वर.

**पुडें** – अवनद्ध वाद्यांसाठीं वापरावयाचें कातडें; कम्प्यभाव असणारें कातडें (Head). १२; समानार्थी शब्द – पुड, पुडी, चर्म, कातडें, पान.
— धुम्पुडें – मृदंगाचें कणिक लावावयाचें व मन्द्र स्वर देणारें पुडें. १०२.
— शाईपुडें – शाईचा टिळा असणारें पुडें.

**पूर्ववत्** – आधींप्रमाणें; अवनम; पूर्वस्थिति.

**पौण्ड्र** – एक प्रकारचें शंखज वाद्य; मोठ्या आकाराचें व खरजांतील शृंग (Bass). ७४ (चित्रावली पाहा.)

**प्रक्षेपक** – क्षेपण करणारा; पुढें फेकणारा.

**प्रचलन** – चाल; चालण्याचा कार्यक्रम.

**प्रणाम** – आदर—भक्ति व्यक्तविणारा उद्घोष; मानवंदनेसाठीं वाजविण्याची छोटी रचना (Salute). ६४

**प्रतान** (प्रतूर्य) – वाद्याची लांबी कमीअधिक होऊं शकणारें शंखज वाद्य (Slide Trombone). ८६, १०३. (चित्रावली पाहा.)

**प्रतिवादी** (स्वर) – विवादी नसलेले स्वर; वादी व संवादी स्वरांपेक्षां बेताचा संवाद करणारा स्वर — नादस्थान.

**प्रतूर्य** – एक प्रकारचें शंखज वाद्य; चिंचोळ्या किंवा अरुंद आणि लांब नळीचें वाद्य (Trombone). १०३.

**प्रत्याहार** – हरकत; विशिष्ट प्रकारचा स्वरसमूह. १२०.

**प्रबोधन** – जागृतीचा उद्‌घोष. (Reveille).

**प्रमाणित** (स्वर) – सांधिकासाठीं ठरविलेला स्वर. (Standard). २८, १४६.

**प्रमाणितता** – प्रमाणबद्धता; प्रमाणीकरण (Standardization).

**प्रांगण** – मोकळी व उघडी जागा; संचलनादि कार्यक्रमासाठी वापरली जाणारी जागा; क्रीडांगण; संघस्थान (Parade ground).

**प्रांगणीय** – मोकळ्यावरील; मैदानावरील; संघस्थानावरील; बंदिस्त नसलेल्या–उघड्या जागेंतील (Outdoor). ६.

**प्रात्यक्षिक** – वादनासह केलेला सामारंभिक कार्यक्रम (Demonstration).

**प्रारंभिक** – ध्रुवपदासारखा छोटा चरण; रचनेचा तोंडावळा (Introduction).

**प्लुत** – गुरूपेक्षां दीर्घ (मात्रा). ३७, ९०.

**फुंक** – सुषिर वाद्यें वाजविण्यासाठीं वायु वापरण्याची कृति; फुंकर. ७७, ८३, ८४.

**बंधक** – आनक किंवा तत्सम वाद्यें चढविण्यासाठीं वापरले जाणारे तणावे; कातडी ताण किंवा बंध (Brace).

**बनात** – चेपलेल्या लोकरीचें कापड (Wool Felt).

**बंब** – एक प्रकारचें अवनद्ध वाद्य; झील-(नगारा)-बरोबर वाजणारें वाद्य; मोठा डग्गा (Big drum). ८७. (चित्रावली पाहा.)

**बांसरी** – एक प्रकारचें सुषिर वाद्य; फुंकून वाजणारें वेळूचें वाद्य; पावा; मुरली; अलगूज; बन्सी (Flute). ८१. (चित्रावली पाहा.)

**बिलावल** – 'वेलावली' पाहा.

**बोल** – तालाचीं वजनें किंवा अवसानें व्यक्त करण्यासाठीं ठरविलेलीं अक्षरें; वर्णाक्षरांचा तालदर्शक समुच्चय. ६२, ९०, ९२.

**म** – मध्यमाचें स्वराक्षर. 'ꣳ' (म्)–मध्यमाचें कणस्वराक्षर. ३०

**मंच** – कलेचें आसन किंवा प्रतिष्ठान; कलाकारांची बैठक; गायन-वादनासाठीं वापराव-याची बंदिस्त जागा.

**मन्द्र** (स्वर) – अवच स्वर; मध्य स्वरांच्या निम्म्या कम्पनांचा स्वर (Octave below). २८, ३२.

— मन्द्रतर – मध्य स्वरांच्या चतुर्थांश कम्पनांचा स्वर; अतिमन्द्र स्वर. २८, ३२, ३३.

— मन्द्रमत – मध्य स्वरांच्या अष्टमांश कम्पनांचा स्वर. ३३.

**मध्य** – (१) (स्वर) – मन्द्र व तार यांच्यामधील स्वर व सप्तक. २८, ३२.

(२) (लय) – विलंबित व द्रुत यांच्यामधील लय. ६६.

(३) (स्थान) – व्यूहाचें केन्द्र.

**मध्यम** – सप्त स्वरांतील चौथा (आणि मधला) स्वर; तीनास चार या प्रमाणांनीं मिळणारा स्वर (Fa; Sub-dominant). २०, २१.

**मातृका** – स्वराक्षरांतील काना; व्यंजनें, स्वराक्षरें, वर्णाक्षरें आणि सर्व परिमाणांच्या मात्रा यांच्या लेखनासाठीं आधारभूत असणारी उभी रेषा (Stem). ३८, ३९.

**मात्रा** – नादांचें कालमान किंवा ऱ्हस्व-दीर्घता मोजावयाचें परिमाण; कालमापनाचें संगीतोपयोगी माप (Note). ३६, १५२.

**मात्रांश** – मात्रेचे अंश; गुरु मात्रेचे ½, ⅓, ¼, इत्यादि अंश. ४३.

**मितकाल** – जागच्या जागीं (चालण्याप्रमाणें) पाय उचलून ठेवणें.

**मींड** – स्वरान्तर करतांना तें मध्यन्तरांतील सर्व संभाव्य नादस्थानांना स्पर्श करून करण्याची पद्धति. ९४, ९९ ते १०३.

**मुक्तराग** – रागाचे नियम मोडलेली रचना. ५७.

**मुख** – शंखज वाद्यांचें तोंड (Mouth piece). ८१.

**मुद्रण** – मुद्रा वापरून प्रत काढणें. ध्वनिमुद्रण – तबकडीवर अथवा टेपवर प्रत करणें.

**मूर्धन्य** – टवर्गांतील वर्णाक्षरें. ८८.

**मृदंग** – एक प्रकारचें अवनद्ध वाद्य; शाईपुड व धुम्पुड असणारें तालवाद्य. ८७, ८९, ९०. (चित्रावली पाहा.)

**मृदुल** – हळू; मंद; नाजूक; छोट्या विस्तारमानाच्या ध्वनिलहरींचा नादावर होणारा परिणाम (Soft). १२, ५०, ५१, ५२.

**मेळ** – विकृत-अविकृत स्वरांचीं ठराविक सप्तकें, थाट (Scale). ५४, १५०.

**यति** – (स्त्रीलिंगी) स्वरांचा अभाव, नादरहितता; विश्रांति (Rest). ४७.

**यतिभंग** – ऐच्छिक व वाढीव कालमानाची मात्रा; अनपेक्षित कालमानाची मात्रा; प्रत्यक्ष दर्शविलेल्या मात्रेच्या सामान्यतः दुप्पट कालमानाची मात्रा (बनविणारें चिन्ह); ' ⌒ ' हें चिन्ह (Pause). १११.

**योगचाप** – लेझिम; खेळतांना–व्यायाम करतांना वापरण्याचें ताल-वाद्य. ८८.

**र** – रणनाचें वर्णाक्षर; '‸' (ऱ्)–रणनाचें कण-वर्णाक्षर ११७.

**रचना** – राग व ताल यांनीं युक्त अशी स्वरसंगति; काव्य, गीत यांच्यासाठीं ठरविलेली चाल. ५३ ते ६८.

**रचनान्तर** – एका रचनेंतून दुसऱ्या रचनेंत जाण्याची क्रिया.

**रंजन** – आनंद-प्राप्ति; करमणूक.

**रणन** – जलद ध्वनिमालिका; गजर; शीघ्रोच्चारण मर्यादा (Roll). ९०, ९३, ११७, ११८.

**रश्मि** – शोभादायक दोरी.

**राग** – स्वरांची रंजक मांडणी किंवा व्यवस्था. ५३, ५५ ते ५७, १५१.

**राग-विज्ञान** – स्वरांचे आरोहावरोह, वर्ज्यावर्ज्य, वादी-संवादी, संचार इत्यादिविषयक नियम किंवा शास्त्र. ५५.

**रागान्तर** – एका रागांतून दुसऱ्या रागांत जाण्याची क्रिया. १५१.

**रुध्** – अवसान किंवा उशी घेण्याची मात्रा.

**ऱ्हस्व** – आखुड; दीर्घच्या मानानें कमी कालमानाचा; लघु (Short). ११

**लघु** – ऱ्हस्व अक्षराच्या उच्चारणाचा काल; गुरु मात्रेच्या निम्मी मात्रा (Quaver) ३६, ४०.

— लघुतर – लघु मात्रेच्या निम्म्या कालाचे परिमाण (Semiquaver). ३७, ४१.

— लघुतम – लघु मात्रेच्या चतुर्थांश कालाचें परिमाण (Demi-semiquaver). ३७, ४२

**लय** – दोन ठोक्यांतील काल किंवा अवकाश. ३८, ५३, ६५ ते ६८, १२९.

— लयकेन्द्र – लयीचा आधार. १३०, १३१.

— लयदर्शन – दिग्दर्शक किंवा प्रमुख यांनीं दाखविलेली लय. १३१.

— लयान्तर – एका लयींतून दुसऱ्या लयींत जाण्याची क्रिया. ६८.

**लयभंग** – चालू लय बदलणें; तात्पुरती लय बदलणें; यतिभंग (Pause). ११०.

**वंशी** – एक प्रकारचें सुषिर वाद्य; फुंकून वाजणारें मूलभूत वाद्य (Flute). ८०, ८१, ८२, १०३.

**वंशीज** – वंशीच्या तत्त्वावर वाजणारीं (वाद्यें). ८१, ८४.

**वक्रगति** – सप्तकांतील स्वर उलटसुलट क्रमानें घेणें. उदाहरणार्थ, सं न ध प ळम प ध ळन ध प म री स (केदार अवरोह). ५७, १५१.

**वर्ज्य (स्वर)** – रागास बाधक स्वर. आरोह व अवरोहांतून वगळावयाचे स्वर, ५५, १५१.

अवर्ज्य (स्वर) – रागास आवश्यक स्वर. १५१.

**वर्ण** – उपकम्पनांमुळें किंवा अनुरणनामुळें ठरणारी नादाची वर्गवारी; ध्वनीची जाति (Quality). १०, १३, ५२, ९१.

**वर्णाक्षर** – वर्ण व्यक्तविण्यासाठीं ठरविलेलें अक्षर. ९१ ते ९३.

**वलय** – अवनद्ध वाद्याचीं चर्में बसविण्याच्या गोल कड्या.

**वाग्गेयकार** – संगीताचा शास्त्री-पंडित; रचनाकार व कलाकार. ६९ ते ७१.

**वादक** – वाद्य वाजविणारा. ७०.

**वादन** – वाजविलेलें संगीत.

**वादी** – रागाचा मुख्य (स्वर); जीवन स्वर; तालाची पहिली (मात्रा); सम. ५६, ६३, १४९.

**वाद्य** – स्वरोत्पत्तीचें साधन; कम्प्यभाव असणारी वस्तु.

**वाद्य-विवरण** – वाद्यांची वर्गवारी, जडण-घडण व गुणविशेषांचें वर्णन (Instrumentation). ७, ७२ ते ९०.

**वाद्यान्तर** – एका वाद्यानंतर दुसरें वाद्य वाजविण्याची कृति.

**वाम** – डावा; (वामतः – डावीकडून; वामेन – डावीकडे.)

**विकृत** (स्वर) – अर्ध्या स्वरानें किंवा एक पट्टीनें उच्च अथवा अवच स्वर; ®री ®ग ®म ®ध ®न हे स्वर. २५, २६.

**विलंबित** (लय) – संथ लय; मध्य लयीच्या निम्मी लय. ६६.

**विवादी** (स्वर) – वर्ज्य स्वर; संवाद नाकारणारे स्वर. २०, १४९.

**विषाण** – एक प्रकारचें शंखज वाद्य (Horn). (चित्रावली पाहा.)

**विसंवादी** – 'विवादी' पाहा. २०

**विस्तार** – व्याप.

**विस्तारमान** – व्यापाचें प्रमाण; व्यापकता (Amplitude). १०, १२.

**विहित** (स्वर) – अपेक्षित; अभिप्रेत; वर्ज्य नसलेला (स्वर). ५५.

**वृत्त** – ठराविक मात्रांचा संच. ६०, १५३.

**वृंदवादन** – सांघिक वादन.

**वेणु** – एक प्रकारचें सुषिर वाद्य; मुरली; आडवी बासरी (Fife). ७९. (चित्रावली पाहा.)

**वेलावली** – एका थाटाचें नांव; सर्व स्वर अविकृत असणारें सप्तक (Major Scale). बिलावल रागाचें मूळ संस्कृत नांव. ५४, ५६, १५०.

**व्यूह** – मांडणी; संपत व्हावयाची आकृति (Formations). १२९.

**शक्ति** (नादाची) – दूरवर पोचण्याची क्षमता; नादाची तुमुलता अथवा मृदुलता (Force of the Sound). १२, ५१.

**शंकराभरण** – वेलावली मेलाचेंच दाक्षिणात्य नांव (धीर-शंकराभरण). ५४, १५०.

**शंख** – एक प्रकारचें सुषिर वाद्य; गुणोत्तर संवादानें स्वर वाजणारें वाद्य; श्रीकृष्णांचें युद्धकालीन वाद्य (Bugle). ८०, ८१, ८२. (चित्रावली पाहा.)

**शंखज** – शंखाच्या तत्त्वावर वाजणारें (वाद्य) ८१, ८४.

**शारिका** – अवनद्ध वाद्यें वाजविण्याच्या टिपऱ्या; छड्या; काठ्या; कम्पक (Drum sticks). ८९.

**शुद्ध** (स्वर) – संवादभावानें सिद्ध होणारीं नादस्थानें. २७.

**शृंग** – सप्त स्वर उपलब्ध असणारें शंखज वाद्य; संयमक-त्रयी उपलब्ध असणारा शंख (Cornet). ८५. (चित्रावली पाहा.)

**शेष** – घोषदण्डाची काठी.

**शेषपुच्छ** – घोषदण्डाचें भूमीवर टेकणारें टोंक.

**श्राव्यबोध** – कानांनीं होणारें ज्ञान.

**श्रुति** – नादाची उच्चावचता मापण्याचें परिमाण; षड्ज ते तार षड्ज या चढाचे बावीस भाग. १८, १४३, १४४.

**श्रुत्यन्तर** – एका श्रुतीनंतरच्या नादस्थानावर जाणें. १८.

**षड्ज** – सप्तस्वरांतील पहिला स्वर; आधारभूत स्वर; जनक स्वर (Tonic or Keynote). १८, २७, ३३, ३४, ८२, ८७.

**षड्रंध्रें** – वंशी व वंशीज वाद्यें यांची लांबी बदलणारीं सहा प्रमुख भोकें (Finger-holes) ८२ ते ८५.

**'ठ' (ष्)** – षड्जाचें कणस्वराक्षर. ३०.

**स** – षड्जाचें स्वराक्षर. ३०.

**संकीर्ण** – सर्व स्वरांचा उपयोग असणारा (राग). ५७.

**संकेत** – घोषदण्डानें द्यावयाच्या आज्ञा.

**संक्षेप** – लघुरूप; लघुलेखन; लेखनांतील बचत. ११२ ते १२१.

**संचार** – रागासाठीं आवश्यक असलेल्या स्वरांचें चलन-वलन. ५७.

**संगत** – पूरक गायन-वादन; साथ.

**संगीत** – रंजक ध्वनिसंगति. १

**संगीत-लेखन** – ठराविक अक्षरें, आकृत्या, अंक व चिन्हें यांच्या साहाय्यानें लिहिलेलें संगीत; संगीत लिहिण्याची पद्धति. ३.

**संघ** – समान उद्दिष्टांचा क्रियाशील समूह.

**संघगीत** – सामूहिक गायनाची कविता.

**संचलन** – सांघिक वाटचाल.

**संचलन-व्यूह** – वाटचालीस उपयुक्त अशी उभें राहाण्याची पद्धति.

**संचालन** – कार्यकारी नियंत्रण, कार्यवाहन.

**संयमक** – शंखज वाद्याची लांबी बदलणारी कळ (Valve). ८३.

**संयमक-त्रयी** – शृंग व तत्सम वाद्यांवर असणारी स्वर-बदलाची योजना. ८३.

**सन्नध्री** – पणव बांधण्याचा पट्टा.

**सप्तक** – षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद या सात स्वरांचा गट. २६.

**सम** – वादी मात्रेचें प्रचलित नांव; तालाची प्रथम मात्रा. ६३.

**समगीत** – सांघिक म्हणण्यासारखी रचना.

**समता** – सामूहिक अस्मिता जागविणाऱ्या कृति; सांघिक कवायत.

**संवाद** – निरनिराळ्या प्रमाणांनीं अन्य स्वरांशीं सहकार्य करण्याचा गुण; स्वरांचें सहजीवन. १७, १८.

**संवादक** – संवाद करणारा—साधणारा. १८.

**संवादभाव** – संवादविषयक प्रमाण. १७, १४७, १४८.

**संवादिता** – संवाद करण्याची शक्ति—योग्यता; संवादश्रेणी. २०.

**संवादी** – रागाचा दुय्यम श्रेणीचा स्वर; तालाची दुय्यम श्रेणीची मात्रा; वादी स्वराशीं मध्यमभाव किंवा पंचमभाव या प्रमाणांनीं संवाद करणारा स्वर; कालाची मात्रा. २०, ५६, ६३, १४९.

**संस्कारित स्वर** – शुद्ध स्वरांपासून किंचित् वेगळे बनविलेले स्वर; पाश्चात्त्य पंडितांकडून वापरले जाणारे स्वर (Tempered scale). २७.

**सांघिक** – सामुदायिक–सामूहिक–एकत्र (Collective) (गायन-वादन). १२८ ते १३४.

**साथ** – मुख्य गायन-वादनास उठाव आणणारें पूरक गायन-वादन; संगत.

**साधनम्** – सिद्धता; पूर्वतयारी; अभ्यास; तप (Make ready). १३५ ते १३९.

**सान्तर** (वादन) – कण-यति घेऊन केलेलें स्वरान्तर-वादन (Tongueing). ९४, ९७, ९८.

**सिद्ध** – सांघिक गायन-वादनास आरंभ करण्याची स्थिति.

**सुषिर** – वाद्यांचा एक प्रकार; फुंकून वाजविण्याचीं वाद्यें; वंशीज व शंखज वाद्यें (Wind and Brass Instruments). ७९ ते ८६.

**सूचक** – सूचना देणारा, सुचविणारा (संकेत).

**सृणी** – पणव, आनक इत्यादि वाद्यें अडकविण्याचा किंवा टांगण्याचा आकडा; काटा; हूक.

**स्त्रीस्वर** – उच्चताप्रधान अनुरणनांनीं युक्त असा स्वर; स्त्रियांचा आवाज (Treble).

**स्वर** – संगीतोपयोगी नादस्थान; नादांच्या उच्चावचतेचें सापेक्ष परिमाण (Tone). १८, १४३.

**स्वरकुल** – षड्ज-ऋषभादि सात स्वर व विकृत स्वरूपांतील पांच स्वर, असें बारा स्वरांचें कुटुंब; षड्ज ते तार षड्ज यांतील संगीतोपयोगी नादस्थानें. २२ ते २९, १४९.

**स्वरद** – एक वंशीज वाद्य; पत्तीयुक्त वंशीज वाद्य (Clarinet). ८०, ८३, १३६. (चित्रावली पाहा.)

॥ ॥

अपत्य-द्वितयं किंवा
त्रयं स्याद् उपकारकम् ।
पर्याप्तं तत् कुटुम्बस्य
सर्वथा सुखकारकम् ॥

## बस दो या तीन बच्चे :
## होते हैं घर में अच्छे





## परिवार नियोजन केन्द्र की पहचान लाल तिकोन

davp 68/278

परिवार-नियोजन-केन्द्र-परिचायकः
'रक्तवर्ण'-त्रिकोणः ।

शारदा–(पुण्यपत्तनम् २.) १०:७ ★ रजि. क्र. एम्. एच्. ५५७
● लायसेन्स क्र. १३७ टु पोस्ट विदौट प्रीपेमेण्ट.

# महाराष्ट्र-संस्कृत-परिषद् पञ्चमाधिवेशनम् १९६९
# प्रज्ञापुरम् ( अक्कलकोट - सोलापुर )

परमसद्गुरु-श्रीगजाननमहाराजानां परमपवित्रे महासन्निधाने प्रज्ञापुरे सोमयाग-महायज्ञानुष्ठानं सुनिश्चितं फाल्गुन शु, १२ तः १५, १८९० ( २८ फेब्रुवारी १९६९तः १, २, ३, ४ मार्च १९६९ ) इति दिन-पञ्चकम्। अस्यैव महायागस्य ज्ञानयज्ञाङ्गत्वेन महाराष्ट्र-संस्कृत-परिषदः पञ्चमाधिवेशनं मन्दे १ मार्च १९६९ तथा भानौ २ मार्च १९६९ इति दिनद्वयं संपत्स्यते ।

शुभाशीर्मङ्गलम् – पू० गजाननमहाराज 'श्री' चरणाः।

स्वागताध्यक्षः – श्रीमान् म. स. पारखे

उद्घाटकः – डॉ० हरिभाऊ पाटसकर

अध्यक्षः – डॉ० श्री. भा. वर्णेकर

वक्तारः – ख्यातकीर्तयः भारतीयाः पण्डितोत्तमाः।

अस्यां परिषदि समुपस्थातुकामैः महाराष्ट्र-प्रदेशस्थैः सर्वैः संस्कृतानुरागिभिः स्वागतसदस्यशुल्कं रूप्यकं पञ्चकं, साधारणसदस्यताशुल्कं वा रूप्यकत्रयं महाराष्ट्र संस्कृत परिषद्, ४२५ सदाशिवपेठ, पुणें २ इति संकेतेन प्रेषणीयम् इति साग्रहं प्रार्थयामहे ।

२१ जानेवारी १९६९<br>पुण्यपत्तनम्

वसन्त अ. गाडगीळ<br>प्रधान कार्यवाहः

संपादकः मुद्रकः प्रकाशकः स्वामी – वसन्त अनन्त गाडगीळ
मुद्रणस्थलम्– यशवन्त मुद्रणालयः, १८३५ सदाशिव, पुण्यपत्तनम् २.
प्रकाशनस्थलम्-१.- म.म. प्रा.द.वा.पोतदार,४९८ शनिवार,पुण्यपत्तनम् २
२.–श्री. ल.म. चक्रदेव, ३१८ राममोहनमार्गः मुम्बापुरी ४
कार्यालयः— खजिनामहालभवनम्, ४२५ सदाशिव, पुण्यपत्तनम् २.